20090831160918001

सन २००९-१० या आर्थिक वर्षातील अर्थसंकल्पीय अनुदाने- ११ पंचायत राज प्रशिक्षण केंद्रांना अनुदान वाटप ( ऑगस्ट ते नोव्हेंबर,२००९ )( दुसरा हप्ता)

महाराष्ट्र शासन
ग्राम विकास व जलसंधारण विभाग
शासन निर्णय क्रमांक :-अनुपं-२००९/प्र.क्र.४७/योजना-४
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,दिनांक:- २८ ऑगस्ट, २००९.

संदर्भ :- १.शासन निर्णय ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण-२०९३/ प्र.क्र. ८४५/०९, दिनांक १७.०९.१९९३
२. शासन परिपत्रक ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण १८९९/ प्र.क्र.५८१/६१, दिनांक २३ सप्टेंबर १९९८
३. शासन परिपत्रक ग्राम विकास व जलसंधारण विभाग क्रमांक प्रशिक्षण २०००/ प्र.क्र.८५९/४४, दि.१२ जून,२००१.
४. शासन निर्णय क्रमांक :-अनुपं-२००९/प्र.क्र.४७/योजना-४,दिनांक २४.४.२००९.

## शासन निर्णय :-

सन २००९-२०१० या आर्थिक वर्षाकरीता, मागणी क्रमांक एल-२, "२०५३ - जिल्हा प्रशासन, (०६) (०१) पंच, सरपंच, सचिव, अशासकीय सदस्य इत्यादींना प्रशिक्षण - राज्य क्षेत्र (२०५३ ०५७ ४ ) " या लेखाशीर्षाखाली, ११ पंचायत राज प्रशिक्षण केंद्रांना वेतन व वेतनेतर बाबींवरील खर्च भागविण्यासाठी अनुक्रमे रुपये १,२३,९४,०००/- व रुपये २९,७४,०००/- अशी एकूण रुपये १,५३,६८,०००/- इतकी तरतूद अर्थसंकल्पित करण्यात आली आहे. वेतनेतर खर्चामध्ये प्रवास खर्च, कार्यालयीन खर्च, पाहुणे व्याख्याता मानधन, भोजन भत्त्यावरील खर्च व आकस्मिक खर्च इत्यादी बाबींचा समावेश आहे.

२. वरील अर्थसंकल्पित करण्यात आलेल्या एकूण तरतूदीमधून एप्रिल ते जुलै, २००९ या चार महिन्यांच्या कालावधीतील वेतन व वेतनेतर बाबींवरील खर्च भागविण्यासाठी संबंधित पंचायतराज प्रशिक्षण केंद्रांना एकूण रुपये ५१,१६,०००/- एवढे अनुदान संदर्भाधीन दिनांक २४.४.२००९ च्या शासन निर्णयान्वये विहित अटी व शर्तींच्या अधीन राहून मंजूर करण्यात आले आहे.

३. आता ऑगस्ट ते नोव्हेंबर, २००९ या चार महिन्यांच्या कालावधीसाठी, या शासन निर्णयासोबत जोडलेल्या विवरणपत्रात दर्शविल्याप्रमाणे एकूण रुपये ६८,६८,०००/- एवढी तरतूद दुस-या हप्त्याच्या स्वरुपात वितरीत करण्यात येत आहे. सदर तरतूद संबंधित विभागीय आयुक्त यांच्या अधीनस्त ठेवण्यात

येत असून सदरचा खर्च करण्यास संबंधित पंचायतराज प्रशिक्षण केंद्रांचे प्राचार्य यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

४. प्रशिक्षण केंद्रांना अनुदान द्यावयाच्या कार्यपध्दतीबाबत शासन परिपत्रक क्र. प्रशिक्षण- ११९८/ प्र.क्र.५८१/६१ दि.२३ सप्टेंबर, १९९८ व शासन परिपत्रक क्र. प्रशिक्षण २०००/प्र.क्र.८५९/४४, दि. १२ जून २००१ अन्वये निर्गमित करण्यात आलेल्या सूचनांच्या अनुंषगाने, सर्व संबंधित उप आयुक्त(आस्था), विकास शाखा, विभागीय आयुक्त कार्यालये यांनी प्रशिक्षण केंद्रास दरमहा अनुदान अदा करण्याची कार्यवाही कालमर्यादेत करावी. तसेच संदर्भ क्रमांक १ येथे दर्शविलेल्या शासन निर्णयातील परिच्छेद क्रमांक १२ मधील अटीनुसार केंद्रांनी खर्च करावा.

५. विभागीय आयुक्त कार्यालयाने अनुदान वितरीत करताना वेतन व वेतनेतर बाबींवर प्रत्यक्ष किती अनुदानाची आवश्यकता आहे ही बाब विचारात घेऊन त्यांच्या कार्यालयाचे आदेश निर्गमित करावेत. मात्र कुठल्याही परिस्थितीत सोबतच्या विवरणपत्रात नमूद केलेल्या अनुदानापेक्षा जास्त अनुदान वितरीत केले जाणार नाही याची दक्षता घ्यावी. तसेच आपल्या अधीनस्थ पंचायतराज प्रशिक्षण केंद्रांकडून करण्यात आलेल्या खर्चाची व उद्दिष्टपूर्तीबाबतची माहिती शासनास दरमहा सादर करावी.

६. प्रशिक्षण केंद्रांनी या संदर्भात केलेल्या खर्चाची मासिक विवरणपत्रे सर्व संबंधित विभागीय आयुक्त यांना पुढील महिन्याच्या १० तारखेपर्यन्त सादर करावीत व अशा सादर केलेल्या मासिक खर्चाची तपासणी विभागीय आयुक्त यांनी करावी. खर्चाचे उपयोगिता प्रमाणपत्र सर्व प्रशिक्षण केंद्रांनी विभागीय आयुक्त यांना सादर करावे. तसेच प्रशिक्षण कार्यक्रमाचे उद्दिष्ट, प्रशिक्षणार्थीचे उद्दिष्ट व साध्य या बाबतचा अहवाल अतिरिक्त महासंचालक, राज्य ग्रामीण विकास संस्था, पुणे यांना न चुकता पाठवावा व त्याची प्रत शासनास पाठवावी.

७. हा खर्च मागणी क्र.एल-२, "२०५३, जिल्हा प्रशासन,(०६) (०१) पंच, सरपंच, सचिव, अशासकीय सदस्य इत्यादींना प्रशिक्षण- राज्यक्षेत्र -( २०५३ ०५७ ४ ), ३१, सहाय्यक अनुदान, ३५ सहाय्यक अनुदान ( वेतन ) " या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकण्यांत यावा व सन २००९-१० या वर्षी केलेल्या अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यांत यावा. तसेच, सदर खर्च त्याच संकेतांकाखाली खर्ची पडतो आहे याची दक्षता घेऊन व खर्चाचा ताळमेळ घालून सर्व संबधित विभागीय आयुक्त यांनी याबाबत खातरजमा करावी व तसे शासनास कळवावे.

८. या अनुदानातून संबंधित प्रशिक्षण केंद्राने केलेल्या खर्चाचे स्वंतत्र लेखे व पुस्तके तपासण्याचा अधिकार यथास्थिती महालेखापाल (लेखा), महाराष्ट्र-१, मुंबई आणि/किंवा महालेखापाल (लेखा),

महाराष्ट्र-२, नागपूर यांना राहील व हे काम योग्य त-हेने पार पाडता यावे म्हणून संबंधित प्रशिक्षण केंद्रे संपूर्ण मदत/सुविधा पुरवतील.

९. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार नियमपुस्तिका, १९७८ भाग- पहिला, उपविभाग- एक अंतर्गत असलेल्या मुंबई वित्तीय नियम, १९५९ मधील तरतूदीनूसार व शासन निर्णय वित्त विभाग क्र.विअप्र १०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दि. १५-५-२००९ सोबतच्या परिशिष्टातील अनु.क्र.२७, नियम क्र.१४९ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या वित्तीय अधिकाराचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

( रि. इ. शेख )
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन

प्रत,
विभागीय आयुक्त,कोकण विभाग,नवी मुंबई ,पुणे,औरंगाबाद,नाशिक,अमरावती व नागपूर (प्रत्येकी २ प्रती)
उप आयुक्त (आस्था) विकास शाखा,विभागीय आयुक्त कार्यालय, कोकण विभाग,नवी मुंबई,पुणे,औरंगाबाद, नाशिक,अमरावती व नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी,कोकण विभाग,नवी मुंबई, पुणे, औरंगाबाद,नाशिक ,अमरावती व नागपूर
महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता),महाराष्ट्र -१,मुंबई.
महालेखापाल, (लेखा परिक्षा/लेखा अनुज्ञेयता),महाराष्ट्र-२,नागपूर .
महासंचालक, यशवंतराव चव्हाण विकास प्रशासन प्रबोधिनी,बाणेर रोड,पुणे .
वित्त विभाग ,कार्यासन क्र. अर्थ-५/व्यय-१५ .
प्राचार्य, पंचायत राज प्रशिक्षण केंद्र (सर्व).
कार्यासन क्र.वित्त-१,वित्त-६, वित्त-७ ग्राम विकास व जलसंधारण विभाग (२ ज्यादा प्रतींसह)
निवड नस्ती का.क्र. योजना-४

## शासन निर्णय क्रमांक अनुपं-२००९/प्र.क्र.४७/योजना-४, दि.२८ ऑगस्ट, २००९ सोबतचे विवरणपत्र

(रुपये हजारात)

| पंचायतराज प्रशिक्षण केंद्राचे नांव | ऑगस्ट २००९ | | | सप्टेंबर २००९ | | | ऑक्टोबर २००९ | | | नोव्हेंबर २००९ | | | एकूण वितरीत अनुदान | | |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| | वेतन | वेतनेतर | एकूण अनुदान | वेतन | वेतनेतर | एकूण अनुदान | वेतन | वेतनेतर | एकूण अनुदान | वेतन | वेतनेतर | एकूण अनुदान | वेतन | वेतनेतर | एकूण अनुदान |
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ | ८ | ९ | १० | ११ | १२ | १३ | १४ | १५ | १६ |
| कोसबाड हिल, ठाणे | ११८ | ३० | १४८ | ११८ | ३० | १४८ | ११८ | ३० | १४८ | ११८ | ३० | १४८ | ४७२ | १२० | ५९२ |
| वर्ये, सातारा | ११५ | ३० | १४५ | ११५ | ३० | १४५ | ११५ | ३० | १४५ | ११५ | ३० | १४५ | ४६० | १२० | ५८० |
| खिरोदा, जळगांव | १३९ | ३१ | १७० | १३९ | ३१ | १७० | १३९ | ३१ | १७० | १३८ | ३१ | १६९ | ५५५ | १२४ | ६७९ |
| गारगोटी, कोल्हापूर | १२५ | ३० | १५५ | १२५ | ३० | १५५ | १२५ | ३० | १५५ | १२५ | ३० | १५५ | ५०० | १२० | ६२० |
| गौडगांव, सोलापूर | ११५ | ३० | १४५ | ११५ | ३० | १४५ | ११५ | ३० | १४५ | ११५ | ३० | १४५ | ४६० | १२० | ५८० |
| मुरुड, लातूर | १३५ | ३० | १६५ | १३५ | ३० | १६५ | १३५ | ३० | १६५ | १३५ | ३० | १६५ | ५४० | १२० | ६६० |
| खामगांव, बुलढाणा | १२४ | ३० | १५४ | १२४ | ३० | १५४ | १२४ | ३० | १५४ | १२४ | ३० | १५४ | ४९६ | १२० | ६१६ |
| शिवाजीनगर, अमरावती | ११५ | ३० | १४५ | ११५ | ३० | १४५ | ११५ | ३० | १४५ | ११५ | ३० | १४५ | ४६० | १२० | ५८० |
| हनुमाननगर, नागपूर | १३९ | ३१ | १७० | १३९ | ३१ | १७० | १३९ | ३१ | १७० | १३८ | ३० | १६८ | ५५५ | १२३ | ६७८ |
| मूल, जि.चंद्रपूर | १३५ | ३० | १६५ | १३५ | ३० | १६५ | १३५ | ३० | १६५ | १३५ | ३० | १६५ | ५४० | १२० | ६६० |
| पुसद, जि.यवतमाळ | १२५ | ३१ | १५६ | १२५ | ३१ | १५६ | १२५ | ३१ | १५६ | १२५ | ३० | १५५ | ५०० | १२३ | ६२३ |
| **एकूण** | **१३८५** | **३३३** | **१७१८** | **१३८५** | **३३३** | **१७१८** | **१३८५** | **३३३** | **१७१८** | **१३८३** | **३३१** | **१७१४** | **५५३८** | **१३३०** | **६८६८** |

**एकूण रुपये ६८,६८,०००/-फक्त ( अक्षरी रुपये अडुसष्ट लाख अडुसष्ट हजार फक्त )**

**( रि.ज.शेख )**

**कार्यासन अधिकारी , महाराष्ट्र शासन**